माथाडी मंडळे व खाजगी सुरक्षा रक्षक मंडळांतील नियमित कर्मचाऱ्यांच्या बदल्यांबाबत

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन परिपत्रक क्र. युडब्ल्यूए २०२३/प्र.क्र.१४८/काम-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:-२६/०६/२०२४

वाचा:-

१. शासनाचे सम क्रमांकीत दि. ११.०८.२०२३ रोजीचे पत्र

परिपत्रक:-

महाराष्ट्र माथाडी, हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ व महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक अधिनियम, १९८१ यामधील तरतुदींची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी अनुक्रमे राज्यातील विविध माथाडी मंडळे व सुरक्षा रक्षक मंडळे यांच्यावर आहे.

राज्यातील माथाडी व सुरक्षा रक्षक मंडळांमधील कामकाजाचे स्वरुप जबाबदारीचे व संवेदनशील आहे. सदर मंडळांची स्थापना होऊन जवळपास ४० ते ५० वर्षे होऊन गेलेली आहेत. सदर मंडळांमध्ये तत्कालीन परीस्थितीमध्ये वर्ग-२, वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे भरण्यात आलेली होती. सदर पदावर नियुक्त झालेल्या बहुतांशी कर्मचाऱ्यांना एकाच पदावर १५ ते २५ वर्षाचा कालावधी उलटुन गेलेला आहे. त्यामुळे कामकाजावर परिणाम होत असल्याचे निर्दशनास आलेले आहे. एकाच पदावर प्रदीर्घ कालावधीत काम करणारे कर्मचारी व त्यांच्या कालावधीबाबत विविध स्तरावरुन तसेच कामगार संघटनांकडून तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत. अशा स्वरुपाच्या संवेदनशील कामकाजामध्ये सुलभता व पारदर्शकता येण्याच्या दृष्टीकोनातून सदर कर्मचाऱ्यांच्या विहीत कालावधीत एका मंडळातुन दुसऱ्या मंडळामध्ये बदल्या करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

माथाडी मंडळे व सुरक्षा रक्षक मंडळे यांच्या कामकाजात एकसुत्रीपणा व पारदर्शकता आणण्याच्या दृष्टीकोनातुन, तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार यापुढे माथाडी मंडळे व खाजगी सुरक्षा रक्षक मंडळांमध्ये कार्यरत असलेल्या सर्व नियमित कर्मचाऱ्यांच्या बदल्या करण्याचे निश्चित केले आहे. त्यास अनुसरुन सदर कर्मचाऱ्यांची बदलीने एका माथाडी मंडळातून इतर माथाडी मंडळात व एका खाजगी सुरक्षा रक्षक मंडळातून इतर खाजगी सुरक्षा रक्षक मंडळात नेमणूका करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच खाजगी सुरक्षा रक्षक मंडळातुन माथाडी मंडळात आणि माथाडी मंडळातुन खाजगी सुरक्षा रक्षक मंडळात प्रतिनियुक्तीने नेमणूका करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळांतर्गत कार्यरत असलेल्या वर्ग-२ व वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांच्या माथाडी व खाजगी सुरक्षा रक्षक मंडळामध्ये तसेच माथाडी व खाजगी सुरक्षा रक्षक मंडळातील कर्मचाऱ्यांच्या कामगार कल्याण मंडळामध्ये समकक्ष पदावर प्रतिनियुक्तीने नेमणूका करण्यास सुध्दा शासनाची मान्यता

देण्यात येत आहे. सदरहु बदल्या/प्रतिनियुक्तीने नेमणूका ह्या खालील अटी व शर्तींच्या अधिन राहुन करण्यात याव्यात:-

१.एका माथाडी मंडळातून दुसऱ्या माथाडी मंडळात तसेच एका खाजगी सुरक्षा रक्षक मंडळातून दुसऱ्या खाजगी सुरक्षा रक्षक मंडळात बदलीने नियुक्ती करण्यात येतील.

२.माथाडी मंडळातून खाजगी सुरक्षा रक्षक मंडळात तसेच कामगार कल्याण मंडळात प्रतिनियुक्तीने नेमणूका केलेल्या कर्मचाऱ्यांच्या सेवा त्यांच्या मूळ कार्यालयामध्ये अबाधित राहतील.

३.बदलीने/प्रतिनियुक्तीने नेमणूका दिलेल्या कर्मचाऱ्यांची मूळ आस्थापना ही त्यांच्या सेवेतील मूळ नियुक्तीचे कार्यालय राहील.

४.प्रस्तुत बदल्या/प्रतिनियुक्तीने नेमणूका या प्रत्येक महसुली विभागांतर्गत असलेल्या माथाडी व खाजगी सुरक्षा रक्षक मंडळे तसेच कामगार कल्याण मंडळांच्या विभागीय कार्यालयांतर्गत महसुली विभागानिहाय करण्यात येतील.

५.सह आयुक्त (माथाडी) तसेच कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई यांनी सर्व कार्यालये/ मंडळांकडून प्रतिनियुक्तीने नेमणूका करण्याबाबतचे प्रस्ताव मंडळ/कार्यालयनिहाय शासनास सादर करावे.

६.सदरची प्रतिनियुक्ती ऐच्छीक स्वरुपाची राहील.

७.अशा प्रकारे प्रतिनियुक्तीने बदली केल्यामुळे सदर कर्मचाऱ्यास प्रतिनियुक्तीच्या पदावरील कोणतेही सेवाविषयक हक्क कायमस्वरुपी प्राप्त होणार नाहीत.

८.सद्यस्थितीत मंडळांच्या क्षमतेनुसार माथाडी मंडळे, खाजगी सुरक्षा रक्षक मंडळे व महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळात कार्यरत असलेल्या समकक्ष पदावरील कर्मचाऱ्यांच्या वेतनात तफावत आहे. तरी अशा स्वरुपाच्या कर्मचाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नेमणूका झाल्यास असे कर्मचारी घेत असलेले वेतन व भत्ते संरक्षित राहतील.

९.अशा कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नेमणूका करण्यासाठी माथाडी व खाजगी सुरक्षा रक्षक तसेच महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळांचा ठराव/सहमती घेणे बंधनकारक राहील.

१०.उपरोक्त नमुद अटी व शर्तींच्या अधीन राहुन मंडळांतील कर्मचाऱ्यांच्या बदलीने/प्रतिनियुक्तीने प्रस्ताव शासनास सादर करावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा सांकेतांक २०२४०६२६१४३४५२२६१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DILIP APPASAHEB VANIRE

Digitally signed by DILIP APPASAHEB VANIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=6528325b6f910d002dacde58c70eb2e2ccbcc8ae23abbb268fad63bcf02405ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E8FC9AC7B1D0E1461368FA477C084A32DF133A6A00339933F9D9F3220D91227, cn=DILIP APPASAHEB VANIRE
Date: 2024.06.26 14:46:47 +05'30'

**( दिलीप आ. वणिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

४.मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
९. मा. उपमुख्यमंत्री (वित्त/गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१०. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
११. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१२. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक,
१३. कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा, मुंबई.
१४. सह आयुक्त (माथाडी), मुंबई.
१५. कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ
१६. निवडनस्ती.